**राज्यातील अल्पसंख्याक बहुल क्षेत्रात मुलभूत नागरी सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी क्षेत्रविकास कार्यक्रम राबविण्याबाबत.**

**सन २०१०-११**

**महाराष्ट्र शासन**
अल्पसंख्यांक विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०१०/प्र.क्र.१०५/का.७,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : १० ऑगस्ट, २०१०**

संदर्भ :- १) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र.अविवि-२००९ /प्र.क्र.४३/०९ /का.-१, दि. ९ फेब्रुवारी, २००९.
२) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र.अविवि-२००९ /प्र.क्र.२३५/०९ /का.-७, दि. २१ ऑगस्ट, २००९.
३) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र.अविवि-२००९ /प्र.क्र.२३५/०९ /का.-७, दि. ३०मार्च, २०१०

**प्रस्तावना :-**

राज्यातील अल्पसंख्याक बहुल क्षेत्रात मुलभूत नागरी सुविधा उपलब्ध करुन देऊन अल्पसंख्याक समुदायाच्या एकंदर जीवनमानाचा दर्जा उंचावण्यासाठी अल्पसंख्याक विकास विभागाने सन २००८-०९ या वर्षापासून राज्यातील नागरी क्षेत्राकरिता क्षेत्रविकास कार्यक्रम कार्यान्वित केला आहे. ही योजना सन २०१०-११ या वर्षात देखिल राबविण्याची बाब राज्य शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाने निश्चित केलेल्या महाराष्ट्रातील ४३ अल्पसंख्यांक बहुल क्षेत्रासाठी प्राधान्याने तसेच ज्या शहरांच्या एकूण लोकसंख्येपैकी किमान १०% लोकसंख्या अल्पसंख्याकांची (मुस्लिम, ख्रिश्चन, बौध्द, जैन, शीख व पारशी) आहे, अशा शहरांतील अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी महानगरपालिका/ नगरपालिका क्षेत्रांत खालील मुलभूत नागरी सुविधांच्या उपलब्धतेसाठी शासनामार्फत सन २०१०-११ या वर्षात अनुदान उपलब्ध करुन दिले जाईलः-

(१) कब्रस्तानची व अंत्यविधीच्या जागेची दुरुस्ती,
(२) पिण्याच्या पाण्याची सुविधा
(३) विद्युत पुरवठा,
(४) सांडपाण्याची व्यवस्था,
(५) रस्ते / पथदिवे
(६) सार्वजनिक स्वच्छतागृहे,
(७) अंगणवाडी , बालवाडी केंद्रे इत्यादी

या योजनेअंतर्गत महानगरपालिकांना कमाल रु.२० लाख, "अ" वर्ग नगरपालिकांना कमाल रु.१५ लाख तर "ब" व "क" वर्ग नगरपालिकांना कमाल रु.१० लाखापर्यंत अनुदान उपलब्ध करुन दिले जाईल.

**योजनेची कार्यपध्दती -**

**१)** या योजनेंतर्गत अनुदान मिळण्यासाठी संबधित महानगरपालिका/नगरपालिका यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील अल्पसंख्याक बहूल क्षेत्रात हाती घ्यावयाच्या विकास कामाचे सविस्तर प्रस्ताव संबंधित महानगरपालिका/नगरपालिका निगमाने उक्त विकासकाम हाती घेण्यास दिलेल्या मंजूरीच्या ठरावासह तसेच या शासन निर्णयासोबतचे प्रपत्र " अ" परिपूर्णरित्या भरून आणि कामाचे सर्व समावेशक अंदाजपत्रक प्रस्तावासोबत जोडून संबधित जिल्हाधिकाऱ्यांकडे दि. ३० सप्टेंबर, २०१० पर्यंत सादर करावेत. तसेच सन २००८-०९ या वर्षात क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत ज्या महानगरपालिका/ नगरपालिका यांना ज्या ज्या विकासकामांसाठी शासनाकडून निधी मंजूर करण्यात आला होता, त्या विकासकामांच्या पुर्ततेबाबतचे उपयोजिता प्रमाणपत्र व सन २००९-१० या वर्षात ज्या विकासकामांसाठी निधी मंजूर करण्यात आला होता, त्या विकासकामांचा प्रगती अहवाल संबंधित महानगरपालिका / नगरपालिकांनी सन २०१०-११ या वर्षासाठीच्या प्रस्तावासोबत संबंधित जिल्हाधिकाऱ्यांना निश्चितपणे सादर करावयाचे आहेत. या योजनेंतर्गत पाठवावयाचे प्रस्ताव अल्पसंख्याक विकास विभागाकडे परस्पर न पाठविता संबंधित जिल्हाधिकाऱ्यांकडे विहित मुदतीत पाठविले जातील, याची संबंधित आयुक्त, महानगरपालिका / मुख्याधिकारी, नगरपालिका यांनी विशेष खबरदारी घ्यावी. संबंधित जिल्हाधिकारी यांच्या शिफारसीशिवाय शासनास परस्पर प्राप्त झालेल्या महानगरपालिका/नगरपालिका यांचे प्रस्ताव विचारात घेतले जाणार नाहीत.

**२)** संबंधित महानगरपालिका/नगरपालिका यांच्याकडून प्राप्त झालेल्या सन २००८-०९ व सन २००९-१० या वर्षातील विकास कामांच्या पुर्ततेबाबतच्या उपयोजिता प्रमाणपत्रासह चालू वर्षाकरिता या योजनेंतर्गत प्राप्त झालेल्या नवीन प्रस्तावांची छाननी करुन हे सर्व प्रस्ताव आपल्या शिफारशींसह संबंधित जिल्हाधिकारी यांनी दि. १५ ऑक्टोबर, २०१० पर्यंत अल्पसंख्यांक विकास विभागास सादर करावेत. जिल्हाधिकारी यांनी असे परिपूर्ण प्रस्ताव पाठवताना संबधित महानगरपालिका / नगरपालिका क्षेत्रात किमान १०% एवढी लोकसंख्या अल्पसंख्याकांची असल्याबाबत प्रमाणित करावयाचे आहे.

**३)** अल्पसंख्यांक बहुल क्षेत्रात हाती घ्यावयाच्या विकास कामांचा प्रस्ताव तयार करताना महानगरपालिका / नगरपालिकांनी पुढील बाबींची दक्षता घ्यावी :-

अ) ज्या क्षेत्रात विकास कामे हाती घ्यावयाची आहेत त्या क्षेत्रात अल्पसंख्याकांची लोकसंख्या किमान १०% आहे, याबाबत संबधित महानगरपालिका/नगरपालिका यांनी खातरजमा करावी व या योजनेंतर्गत अल्पसंख्याक संकेंद्रित भागात मुलभूत नागरी सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी अनुदानाचा विनियोग होईल असे पहावे.

ब) अल्पसंख्यांक बहुल क्षेत्रात हाती घ्यावयाच्या विकास कामांचा प्रस्ताव तयार करताना संबंधित महानगरपालिका / नगरपालिका यांनी त्या क्षेत्रातील अल्पसंख्यांक समाजाच्या मुलभूत व निकडीच्या गरजा लक्षात घ्याव्यात. तसेच याआधी शासनाकडून ज्या प्रयोजनासाठी /विकासकामांसाठी निधी मंजूर करण्यात आला होता, अशी प्रयोजने / विकासकामे वगळून अन्य प्रयोजनांसाठी अनुदानाची मागणी केली जाईल, याची दक्षता घ्यावी.

क) या योजनेतून अल्पसंख्यांक समाजाचा सामूहिक लाभ होईल अशी सार्वजनिक हिताचीच कामे हाती घ्यावीत. वैयक्तिक लाभाच्या योजना हाती घेणे कटाक्षाने टाळावे.

**४)** संबधित महानगरपालिका/नगरपालिका यांनी पाठविलेल्या विकास कामांच्या प्रस्तावांची छाननी उपरोक्त निकषांनुसार संबधित जिल्हाधिकाऱ्यांनी केल्यानंतर त्यांच्यामार्फत शासनाकडे पाठविण्यात आलेल्या प्रस्तावांवर शासनाकडून विचार विनिमय होऊन संबधित महानगरपालिका/नगरपालिका यांना मंजूर करण्यात आलेले अनुदान जिल्हाधिकाऱ्यांकडे सुपुर्द करण्यात येईल व जिल्हाधिकाऱ्यामार्फत संबधित महानगरपालिका/नगरपालिका यांना वितरीत केले जाईल.

५) शासनामार्फत अनुदान मंजूर करण्यात आल्यानंतर ३ महिन्याच्या आत संबंधित महानगरपालिका / नगरपालिकांनी प्रस्तावात नमूद केलेली कामे पूर्ण करणे आवश्यक आहे व याबाबतची उपयोजिता प्रमाणपत्रे संबंधित महानगरपालिका / नगरपालिकांनी जिल्हाधिकाऱ्यांमार्फत अल्पसंख्यांक विकास विभागाकडे सादर करणे बंधनकारक असेल.

६) या योजने अंतर्गत निधी प्राप्त होणार असल्याने शासन अल्पसंख्यांकांसाठी सद्यःस्थितीत राबवित असलेल्या इतर विविध कल्याणकारी योजनांकरिता प्राप्त होणारे अनुदान संबंधित महानगरपालिका / नगरपालिकांनी दुसऱ्या कामासाठी वळवू नये.

७) सन २००८-०९ या वर्षात संबंधित महानगरपालिका / नगरपालिका यांनी या योजनेंतर्गत हाती घेतलेल्या विकासकामांच्या पुर्ततेबाबतचे उपयोजिता प्रमाणपत्र तसेच सन २००९-१० या वर्षात हाती घेतलेल्या विकासकामांचा प्रगती अहवाल चालू वर्षाकरिताच्या प्रस्तावासोबत न पाठविल्यास अशा महानगरपालिका/नगरपालिका यांना सन २०१०-११ या वर्षात निधी वितरित केला जाणार नाही, याची नोंद संबंधित आयुक्त, महानगरपालिका/ मुख्याधिकारी, नगरपालिका व संबंधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावयाची आहे.

या योजनेसाठी होणारा खर्च " मागणी क्र. झेडई-१ ए, मुख्यलेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०७) अल्पसंख्याक सर्केंद्रित क्षेत्रातील क्षेत्र विकास कार्यक्रमाकरिता सहायक अनुदान (२२३५-ए-१३१) ३१ सहायक अनुदान " या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात येईल व चालू वित्तीय वर्षात या शीर्षाखाली उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०१००८०९१८५३२५००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सही/-**
**( इ.मु.काझी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा.उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,

महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) , मुंबई / नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त, नगरपालिका प्रशासन, मुंबई,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
आयुक्त, सर्व महानगरपालिका,
मुख्याधिकारी, सर्व नगरपालिका,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी),
निवडनस्ती,